संस्थांमधील वैद्यकीय अधिका-यांच्या मानधनात वाढ करणेबाबत...

200407191674140001-2500

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र: क्र.  /२००१/ बालन्यु २००१ /प्र.क्र.१११/का.१**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२.**
**दिनांक :- २६ सप्टेंबर , २००१.**

**वाचा :**

१. बाल न्याय अधिनियम १९८६ व बाल न्याय ( मुलांची संरक्षण व काळजी) अधिनियम २०००.

२. शासन निर्णय, महिला व बाल कल्याण विभाग , क्रमांक जेजेए १०९०/१००५१३/प्र.क्र.३१/ सुधार- ३/का.३, दिनांक २४ नोव्हेंबर, १९९३.

३. शासन परिपत्रक , वित्त विभाग क्रमांक पूरक १००१ / प्र.क्र.१२/२००१ / अर्थसंकल्प ३ , दिनांक ३ ऑगस्ट २००१.

**शासन निर्णय** भिवंडी निरिक्षणगृहातील घटनेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने याचिका क्रमांक ११०७ /९६ च्या अनुषंगाने दिलेल्या आदेशानुसार, निरीक्षण गृह व बालगृहाला भेट देणा-या मानसेवी वैद्यकीय अधिका-यास सध्या देण्यात येत असलेले रु. २००/- दरमहा ऐवजी यापुढे संस्थेस दिलेल्या प्रत्येक भेटीपोटी रु. १००/- परंतु जास्तीत जास्त रु. १,२००/- दरमहा या मर्यादेत मानधन देण्यास शासन मान्यता येत आहे.

२. यावरील खर्च "मागणी क्रमांक एक्स १- २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण - ०२ - समाज कल्याण - १०२ - बाल कल्याण दोन (१) सुधारलेल्या व्यक्तीकरीता संस्था किंवा सुधारगृहे चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (२२३५ १०६ ७) योजनेतर" या वित्तीय या वित्तीय लेखाशिर्षाखाली सन २००१-२००२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. चालू पंचवार्षिक योजनेमध्ये मंजूर केलेल्या संस्थांमधील वैद्यकीय अधिका-यांच्या वाढीव मानधनावर होणारा खर्च मागणी क्रमांक एक्स १ "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण - ०२ - समाज कल्याण १०२ बाल कल्याण (दोन) पंचावार्षिक योजनांतर्गत योजना - निराश्रीत बालकांसाठी संस्थेतर सेवा (२२३५ ११५ ६ ) योजनांतर्गत" या या वित्तीय लेखाशिर्षाखाली सन २००१-२००२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

C:\My Documents\G.R. deelil.doc

४.		हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५४१/२००१/व्यय १४, दिनांक ३०.६.२००१ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५.		हे आदेश या आदेशाच्या दिनांका पासून लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग.गो.पंचभाई )
शासनाचे उप सचिव.

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र १ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र २ [लेखा व अनुज्ञेयता] नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र १ [लेखा परिक्षा], मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र २ [लेखा परिक्षा], नागपूर.
वित्त विभाग (व्यय -११), मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग (कार्यासन १४७५), मंत्रालय, मुंबई.
महिला व बाल बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीय महिला व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ज्येष्ठतम).
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
निवड नस्ती कार्यासन क्र. ३.